**एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत कार्यरत अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका या मानधनी कर्मचाऱ्यांना सन २०२१-२२ या वित्तीय वर्षासाठी "भाऊबीज भेट" रक्कम मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०२१/प्र.क्र.२१०/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २८ ऑक्टोबर, २०२१

वाचा :- महिला व बाल विकास विभाग,शा.नि.क्र.एबावि-२०१७/प्र.क्र.१०३/का.६,दि.२३ फेब्रुवारी २०१८

**प्रस्तावना :-**

एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत कार्यरत अंगणवाडी सेविका, अंगणवाडी मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका या मानधनी कर्मचाऱ्यांना सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात प्रत्येकी रु. २,०००/- प्रमाणे भाऊबीज भेट रक्कम अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

एकात्मिक बाल विकास सेवा योजना या केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत कार्यरत असलेल्या अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका या मानधनी कर्मचाऱ्यांना सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात प्रत्येकी रु. २,०००/- प्रमाणे भाऊबीज भेट रक्कम देण्यास शासन मंजूरी देत आहे.

२. एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत कार्यरत असलेल्या अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका यांना भाऊबीज भेट अदा करण्याकरिता आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून यासाठी होणारा खर्च भागविण्यासाठी मागणी क्रमांक :- एक्स-१, २२३६, पोषण आहार, (०८) (०६) एकात्मिक बाल विकास सेवा योजना, (भाऊबीज भेट) (अतिरिक्त राज्य हिस्सा १००%) (२२३६ १९५४), ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात मंजूर केलेल्या तरतुदीमधुन रुपये ३७.९७३२ कोटी (अक्षरी रुपये सदतीस कोटी सत्यान्नव लाख बत्तीस हजार फक्त) इतका निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

३. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांनी कार्यरत अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका यांना भाऊबीज भेट अदा करण्याची कार्यवाही तातडीने करावी.

४. हा शासन निर्णय नियोजन विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.२०८/१४७२, दिनांक ०८/१०/२०२१ व वित्त विभागाने अनौपचारीक संदर्भ क्र.२३५/व्यय-६, दिनांक २१/१०/२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२८१२४८२७०८३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VARUDKAR MAHESH ASHOKRAO

Digitally signed by VARUDKAR MAHESH ASHOKRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d93c4961d98086877a4048296211d7af97ecfd40d7967c43d20b360d83ce0fa6, pseudonym=58C42BF9F3ABBB1C15CFBC42D0AA8503E42564DB, serialNumber=7EBBBC3712E8D459EF90BF7AAE4EA46E9CAEBDD50CFECDE2EE7CE0454FA0416A, cn=VARUDKAR MAHESH ASHOKRAO
Date: 2021.10.29 18:53:20 +05'30'

**( महेश वरुडकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा.मंत्री (महिला व बाल विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.राज्यमंत्री(महिला व बाल विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
६) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग यांचे स्वीय सहाय्यक,, मंत्रालय, मुंबई
७) प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
८) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना ,महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई
९) आयुक्त, महिला व बाल विकास ,पुणे
१०) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
११) सर्व विभागीय उप आयुक्त, महिला व बाल विकास विभाग
१२) सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी, (महिला व बाल विकास), जिल्हा परिषद
१३) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण/नागरी/आदिवासी प्रकल्प)
१४) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर
१५) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व परिक्षा), मुंबई /नागपूर
१६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१७) महिला व बाल विकास विभागातील सर्व कार्यासने
१८) निवड नस्ती (कार्यासन ६).